शासकीय गोदाम दुरुस्ती कामास निधी उपलब्ध करून देणेबाबत. बामणी ता.जिंतुर जि.परभणी ( सन २०१९-२०)

महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
**शासन निर्णय क्रमांक: गोदादु १११९/प्र.क्र.३२(भाग-१)/नापु-१६ ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख:- १७ मार्च, २०२०.

वाचा-

१. शासन निर्णय क्रमांक-गोदादु-१११६/३०६७/ प्र.क्र.१२७९/ नापु-१६-ब, दि.१५.०५.२०१७
२. शासन निर्णय क्रमांक-गोदादु-१११६/३०६७/प्र.क्र.१२७९-भाग-१/नापु-१६-ब, दि.१५.०५.२०१७
३. शासन निर्णय क्रमांक-गोदादु-१११९/प्र.क्र.३२/ नापु-१६-ब, दि.२४.०७.२०१९.
४. जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी यांचे पत्र क्र.२०२०/पुरवठा/जीडीएन/कावी, दि.१४.०२.२०२०.

प्रस्तावना-

संदर्भीय शासन निर्णय क्र.३ अन्वये गोदाम दुरुस्ती कामांना सन २०१९-२० मध्ये निधी उपलब्ध करुन दिला आहे. जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी यांनी संदर्भीय क्र.४ अन्वये परभणी जिल्ह्यातील गोदाम दुरुस्तीपुर्ण कामांचा अखर्चित निधी **₹७,१५,६०२/-** एवढया निधीपैकी **₹१४,९४३/-** इतका निधी बामणी ता.जिंतूर येथील गोदामाच्या दुरुस्तीस वर्ग करुन देण्याबाबतची विनंती केली आहे. त्याअनुषंगाने संदर्भीय शासन निर्णय क्र. ३ अन्वये वितरीत परभणी जिल्हयातील गोदाम दुरुस्तीचा निधी बामणी ता.जिंतुर येथील गोदाम दुरुस्ती कामांसाठी वर्ग करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीनआहे.

शासन निर्णय-

सन २०१९-२० मध्ये वितरीत निधीपैकी जिंतूर गोदाम क्र.०१ चे रु.१,३५,७४३, जिंतूर गोदाम क्र.०२ चे रु.२,७९,४६१, बोरी ता. जिंतूर गोदाम क्र.०१ चे रु.२,१०,४२०, बोरी ता. जिंतूर गोदाम क्र.०२ चे रु.८९,९७८ इतका अखर्चित निधी ( एकूण रु. ७,१५,६०२ /-) काम पुर्ण झाल्यामुळे शिल्लक निधीपैकी रु.१४,९४३/- इतका निधी बामणी ता. जिंतूर येथील गोदामाच्या दुरुस्तीस प्रशासकीय

मान्यतेसंदर्भातील संबंधित शासन निर्णय क्र.०१ मधील नमूद अटींच्या अधीन राहून वर्ग करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | प्रशासकीय मान्यतेच्या आदेशानुसार अंदाजित खर्च (₹) | यापूर्वी वितरीत निधी (₹) | सदर आदेशान्वये वर्ग करुन देण्यात येत असलेला निधी (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | परभणी | जिंतूर | बामणी | २०,६०,६२३ | १७,१८,८०७ | १४,९४३ |
| **एकूण** | | | | | | **१४९४३/-** |
| **अक्षरी रुपये :- चौदा हजार आणि नऊशे त्रेचाळीस फक्त.** | | | | | | |

२. **संबंधित गोदामासाठी मंजूर केलेला निधी प्रत्यक्ष खर्ची होताच निधीच्या विनियोगाचे उपयोगिता प्रमाणपत्र त्वरीत शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी, परभणी यांनी घ्यावी.**

३. सदर गोदाम दुरुस्तीचे काम पुर्ण झाल्यानंतर हे काम मंजूर अंदाजपत्रकाप्रमाणे उत्कृष्ट झाल्याबाबतची खातरजमा संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा पुरवठा अधिकारी संयुक्तरित्या करुन तसा निरिक्षण अहवाल तयार करावा व अभिलेखामध्ये जतन करुन ठेवावा.

४. सदरहू निधी ठेव अंशदान म्हणून वर्ग करता येणार नाही, याची नोंद घ्यावी.

५. सन २०१९-२० या वित्तीय वर्षामध्ये सदर गोदाम दुरुस्तीचा खर्च " मागणी क्रमांक एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८ अन्न साठवण व वखार साठवण, (०३) प्रापण वितरण व किमंत नियंत्राण (०३)(०२) मुफसल, (योजनेतर) (दत्त्मत) (२४०८ ०१०८) २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. संबंधित गोदाम दुरुस्ती कामासाठी प्रशासकीय मान्यता आदेशानुसारच्या खर्चापेक्षा अधिक निधी वितरीत होणार नाही याबाबत संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकारी यांची राहील.

७. प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात कामाचे संक्षिप्त स्वरुप नमूद करण्यार आलेले असून प्रत्यक्षात गोदाम दुरुस्तीचे काम सादर केलेल्या दुरुस्ती कामांच्या अंदाजपत्रकानुसारच पूर्ण करण्यात यावे. म्हणजेच सादर केलेल्या अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीनुसार गोदाम दुरुस्तीचे काम पूर्ण करण्यात यावे.

८. वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ च्या भाग-१ उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास प्राप्त झालेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८११५६५६१६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food, Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b, serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2020.03.18 12:00:07 +05'30'

**( प्र. गि. चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, परभणी.
२. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
३. उप आयुक्त ( पुरवठा ), औरंगाबाद.
४. जिल्हा पुरवठा अधिकारी,परभणी.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,परभणी.
६. जिल्हा कोषागार अधिकारी,परभणी.
७. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
१०. वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
११. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
१२. सहाय्यक संचालक (संगणक) लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.
१३. निवड नस्ती/नापु-१६ब.